**सरकारी वकील, उच्च न्यायालय मुंबई, खंडपीठ औरंगाबाद व मुख्य सादरकर्ता अधिकारी, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण मुंबई, खंडपीठ औरंगाबाद या कार्यालयाकरिता नियमित स्वरुपात व काल्पनिक पदे निर्माण करण्यास मान्यता देण्याबाबत.**

## महाराष्ट्र शासन

**विधि व न्याय विभाग**

**शासन निर्णय क्र. संकीर्ण २८१६/प्र.क्र.१६०/१६/का.०८**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १४ जून, २०१७.

<u>वाचा</u> :- १) शासन निर्णय, विधि व न्याय विभाग क्र.संकीर्ण १००६/६०१/(प्र.क्र.९५)/का.०८, दिनांक १५.२.२००७.

२) सरकारी वकील, उच्च न्यायालय मुंबई, खंडपीठ औरंगाबाद यांचे पत्र क्र.WP/ABG/ ४६२६/२०१७ दिनांक २.५.२०१७ चे पत्र व त्यासोबत रिट पिटीशन क्र.५८२४/२०१६ मा. उच्च न्यायालय मुंबई, खंडपीठ औरंगाबाद यांचे दिनांक २७.४.२०१७ चे आदेश.

**<u>प्रस्तावना :-</u>**

विधि व न्याय विभागाच्या अधिपत्याखालील सरकारी वकील, उच्च न्यायालय मुंबई, खंडपीठ औरंगाबाद कार्यालयासाठी उपरोक्त क्र.१ येथील शासन निर्णयासोबतच्या विवरणपत्र-अ मधील अ.क्र.७ नुसार विविध संवर्गातील एकूण ७० पदे मंजूर करण्यात आली होती.सरकारी वकील, उच्च न्यायालय मुंबई, खंडपीठ औरंगाबाद कार्यालयाचे काम उच्च न्यायालयाच्या कामकाजाशी निगडीत असून कार्यालयाच्या कामकाजाचा भार वाढला आहे. कर्मचाऱ्यांच्या अपुऱ्या संख्येमुळे न्यायालयीन कामे विहित मुदतीत पूर्ण करणे कठीण होत आहे. ही बाब विचारात घेऊन रिट याचिका क्र.५८२४/२०१६ च्या दिनांक २७.४.२०१७ रोजी झालेल्या सुनावणीच्या वेळी मा.उच्च न्यायालयाने सरकारी वकील कार्यालय, उच्च न्यायालय मुंबई, खंडपीठ औरंगाबाद या कार्यालयाकरिता अतिरिक्त पदे मंजूर करण्याच्या प्रस्तावावर चार आठवड्यात निर्णय घेऊन त्याबाबतचे आदेश पारित केल्यापासून सहा महिन्यांच्या आत पदे भरण्याचे आदेश दिले आहेत. त्यानुसार सरकारी वकीलांचे कार्यालय, उच्च न्यायालय मुंबई, खंडपीठ औरंगाबाद व मुख्य सादरकर्ता अधिकारी, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण मुंबई, खंडपीठ, औरंगाबाद या कार्यालयांसाठी अतिरिक्त पदे मंजूर करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

मा.उच्च न्यायालय मुंबई, खंडपीठ औरंगाबाद यांनी दिलेल्या आदेशाचे पालन करण्याकरिता चक्रीय पध्दतीने उच्चस्तरीय सचिव समितीने दिलेल्या मान्यतेनुसार सरकारी वकील, उच्च न्यायालय मुंबई, खंडपीठ औरंगाबाद या कार्यालयासाठी २२ पदे नियमित स्वरुपात व २५ काल्पनिक पदे अशी एकूण ४७ नवीन अतिरिक्त पदे (सोबत जोडलेल्या विवरणपत्र "अ" मध्ये दर्शविलेल्या तपशीलानुसार) तसेच महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण मुंबई, खंडपीठ औरंगाबाद येथील मुख्य सादरकर्ता अधिकारी यांच्या कार्यालयासाठी ३ पदे नियमित स्वरुपात व २ पदे काल्पनिक अशी एकूण ५ नवीन अतिरिक्त पदे

(सोबत जोडलेल्या विवरणपत्र "ब" मध्ये दर्शविलेल्या तपशीलानुसार) निर्माण करुन ती नियमित स्वरुपात/बाह्य यंत्रणेद्वारे भरण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

२. मा. उच्च न्यायालयाने दिलेल्या विहित मुदतीत वरील पदे या शासन निर्णयासोबतच्या विवरणपत्र "अ" व "ब" मधील तपशीलाप्रमाणे नियमीत स्वरूपात/बाह्य यंत्रणेद्वारे भरण्यासाठी सह सचिव, विधि व न्याय विभाग, औरंगाबाद यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. याबाबतच्या सूचना यथावकाश निर्गमित करण्यात येतील.

३. उपरोक्त नियमित स्वरुपातील पदावर होणारा खर्च "मागणी क्र.जे-१, २०१४ न्यायदान (दत्तमत) ११४ (००)(०१) विधि सल्लागार व समुपदेशी शहर अधिकारी ०१-वेतन (२०१४ ०२०९)" या लेखाशीर्षाखाली त्या-त्या वर्षी मंजूर करण्यात येणा-या तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. तसेच काल्पनिक पदांसाठी (बाहययंत्रणेद्वारे भरावयाची पदे) देय होणारी मानधनाची रक्कम "१३ कार्यालयीन खर्च" या लेखाशिर्षाखाली मंजूर व वितरित अनुदानातुन अदा करण्यात यावी.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२४८/आ.पु.क. दिनांक ०७.०६.२०१७ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार तसेच उच्चस्तरीय सचिव समितीने दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र २०१७०६१४१८११९७८१२ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Rajendra D Sawant

Digitally signed by Rajendra D Sawant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law And Judiciary, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6c5df198d588de75e335db20487f4df45c73eca4ce5875cd77fd8b1924a3fdf8, cn=Rajendra D Sawant
Date: 2017.06.14 18:09:18 +05'30'

**( रा. द. सावंत )**
**विधि सल्लागार नि सह सचिव**
**महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) सर्व विधानसभा/विधान परिषद सदस्य,
२) मा.राज्यपालांचे सचिव,
३) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
४) मा.राज्यमंत्री (विधि व न्याय) यांचे खाजगी सचिव,
५) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन यांचे सह सचिव,
६) प्रधान सचिव व विधि परामर्शी, विधि व न्याय विभाग यांचे वरिष्ठ स्वीय सहायक,
७) प्रधान सचिव (विधि विधान), विधि व न्याय विभाग यांचे स्वीय सहायक,
८) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर,
९) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई (२ प्रती),

१०) कोषागार अधिकारी, औरंगाबाद,
११) सह सचिव, विधि व न्याय विभाग, औरंगाबाद,
१२) वित्त विभाग/व्यय-५, आ.पु.क, मंत्रालय, मुंबई,
१३) सरकारी वकील, उच्च न्यायालय मुंबई, खंडपीठ औरंगाबाद,
१४) मुख्य सादरकर्ता अधिकारी, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण मुंबई, खंडपीठ औरंगाबाद,
१५) निवड नस्ती/कार्या.आठ.

## शासन निर्णय क्र.संकीर्ण-२८१६/प्र.क्र.१६०/१६/कार्या.आठ, दिनांक १४ जून, २०१७ सोबतचे विवरणपत्र "अ"

| कार्यालयाचे नांव | उच्च स्तरीय सचिव समितीने मान्यता दिलेली पदे | एकूण पदांचे संवर्गनिहाय विवरण व प्रत्येक पदाची वेतनश्रेणी/मानधन | | |
|---|---|---|---|---|
| | | पदनाम | मंजूर पदे | वेतनश्रेणी/मानधन |
| सरकारी वकील, उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद | अ) नियमित स्वरुपातील पदे - २२ | अधिक्षक | ०३ | रु.९,३००/- - रु.३४,८००/- (ग्रे.पे.रु.४,३००/-) |
| | | लघुलेखक (उच्चश्रेणी) | ०३ | रु.९,३००/- - रु.३४,८००/- (ग्रे.पे.रु.४,४००/-) |
| | | लघुलेखक (निम्नश्रेणी) | ०५ | रु.९,३००/- - रु.३४,८००/- (ग्रे.पे.रु.४,३००/-) |
| | | पर्यवेक्षी वरिष्ठ लिपिक | ०३ | रु.५,२००/- - रु.२०,२००/- (ग्रे.पे.रु.२,४००/-) |
| | | लिपिक-टंकलेखक | ०७ | रु.५,२००/- - रु.२०,२००/- (ग्रे.पे.रु.१,९००/-) |
| | | सहायक ग्रंथपाल | ०१ | रु.५,२००/- - रु.२०,२००/- (ग्रे.पे.रु.२,८००/-) |
| | | **एकूण नियमित स्वरुपातील पदे** | **२२** | |
| | ब) काल्पनिक पदे - २५ (बाहययंत्रणेद्वारे भरावयाची) | लघुलेखक (निम्नश्रेणी) | १० | रु.२०,०००/- प्रतिमाह मानधन |
| | | लिपिक-टंकलेखक | ०८ | रु.१५,०००/- प्रतिमाह मानधन |
| | | शिपाई | ०५ | वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.पदनि-२०13/प्र.क्र.११२/१३/वित्तीय सुधारणा-१, दि.०२.१२.२०13 मधील सूचना क्र.३ अन्वये कार्यवाही करण्यात यावी. |
| | | झेरॉक्स ऑपरेटर | ०१ | |
| | | सफाई कामगार | ०१ | |
| | | **बाहययंत्रणेद्वारे भरावयाची एकूण काल्पनिक पदे** | **२५** | |
| | **एकूण ४७ पदे** | | **४७** | |

## शासन निर्णय क्र.संकीर्ण-२८१६/प्र.क्र.१६०/१६/कार्या.आठ, दिनांक १४ जून, २०१७ सोबतचे विवरणपत्र "ब"

| कार्यालयाचे नांव | उच्च स्तरीय सचिव समितीने मान्यता दिलेली पदे | एकूण पदांचे संवर्गनिहाय विवरण व प्रत्येक पदाची वेतनश्रेणी/मानधन | | |
|---|---|---|---|---|
| | | पदनाम | मंजूर पदे | वेतनश्रेणी/मानधन |
| मुख्य सादरकर्ता अधिकारी, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपीठ औरंगाबाद | अ) नियमित स्वरुपातील पदे - ०३ | लघुलेखक (निम्नश्रेणी) | ०२ | रु.९,३००/- - रु.३४,८००/- (ग्रे.पे.रु.४,३००/-) |
| | | लिपिक-टंकलेखक | ०१ | रु.५,२००/- - रु.२०,२००/- (ग्रे.पे.रु.१,९००/-) |
| | ब) काल्पनिक पदे -२ (बाहययंत्रणेद्वारे भरावयाची) | शिपाई | ०२ | वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.पदनि-२०13/प्र.क्र.११२/१३/वित्तीय सुधारणा-१, दि.०२.१२.२०13 मधील सूचना क्र.३ अन्वये कार्यवाही करण्यात यावी. |
| | **एकूण ०५ पदे** | | **०५** | |